GR-200408061736050002-(20)

दरभाव वाढीचा फरक मक्तेदारांना प्रदान करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक-झेडपीए २००२/प्र.क्र.३७९/वित्त-९
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - १४-११-२००२

वाचा :- शासन परिपत्रक,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.झेडपीए १०९७/ प्र.क्र.१९४३/३३ दिनांक ४.९.२०००

## शासन परिपत्रक

सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी १०९१/प्र.क्र.१२/टी-२, दिनांक १०.१.१९९२ अन्वये दराच्या किंमतीतील वाढीचा फरक मक्तेदारांना प्रदान करण्याबाबतचे आदेश जिल्हा परिषदांना लागू राहणार नाही असे संदर्भाधीन परिपत्रकान्वये कळविण्यात आले होते. याअनुषंगाने जिल्हा परिषदांकडून प्राप्त झालेल्या विविध प्रस्तावांवर विचार करुन आत्ता खालील प्रमाणे निर्देश देण्यात येत आहे.

१. दिनांक ४.९.२००० पूर्वीच्या निविदेत जर दरभाव वाढीचे कलम टाकण्यात आले असेल तर खास बाब म्हणून अशा प्रकरणास दरभाव वाढ मंजूर करण्यात यावी.

२. दिनांक ४.९.२००० नंतर मात्र दरभाव वाढ लागू होणार नाही. परंतू असे की, ज्या प्रकरणात जिल्हा परिषद वा शासनामुळे निधी उपलब्धतता व अन्य कारणांमुळे कामाच्या मुदतीत वाढ झाली असल्यास केवळ त्याच संदर्भात दरभाव वाढ देण्याबाबत विचार करण्यात येईल असे कलम निविदेत अंतर्भूत करण्यात यावे. निविदेत हेही स्पष्ट करण्यात यावे की, याव्यतिरिक्त अन्य कुठल्याही कारणास्तव कोणत्याही परिस्थितीत दरभाव वाढ लागू होणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल याच्या आदेशानुसार व नांवाने,

( जयश्री चौधरी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,
सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,
कार्यकारी अभियंता, लघुपाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
सर्व उपमुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नाशिक, पुणे, नागपूर, औरंगाबाद, अमरावती.
सर्व जिल्हा स्थानिक निधी लेखा अधिकारी.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.